M2



विताली बिआंकी

# लाल टेकडी



चिक नावाचा एक लहान लाल चिमणा होता. तो एक वर्षाचा झाला तेव्हा त्याने चिरिका नावाच्या एका चिमणीशी लग्न केले व स्वत:चे घर बांधायचे ठरवले.

"चिक" चिरिका चिमण्यांच्या भाषेत म्हणाली, "चिक, आपलं घरटं आपण कुठं बांधू या? आपल्या बागेतल्या सगळ्या झाडांच्या ढोल्यांमध्ये जागा नाही बघ. सारीजण आधीच राहताहेत त्यामधून!"

"काही अवघड नाही," साहजिकच चिकसुद्धा चिमण्यांच्या भाषेत म्हणाला. "आपण आपल्या शेजाऱ्यांना त्यांच्या जागेतून हाकलून देऊ आणि झाडातली त्यांची ढोली आपण घेऊ."

चिकला नेहमी मारामारी करायची खुमखुमी यायची. चिरिकासमोर आपले शौर्य दाखवायची अशी नामी संधी आलेली पाहून चिक महाशय अगदी खूष झाले. घाबरट चिरिकाने त्याला अडविण्यापूर्वीच तो ज्या झाडाच्या फांदीवर बसला होता तेथून उडाला आणि ॲश नावाच्या एका भल्या मोठ्या झाडातील ढोलीकडे गेला. तिथे त्याच्याच वयाचा एक चिमणा रहात होता.

त्या घरट्याचा मालक घरात नव्हता.

चिकने मनाशी विचार केला, "मी आता घरट्यात जाऊन बसेन आणि जेव्हा या घरट्याचा खरा मालक येईल तेव्हा मी प्रचंड कांगावा करून आरडाओरडा करीन आणि तो मला माझ्या घरातून बाहेर हाकलतोय असं सर्वांना सांगीन. सारे मोठे चिमणे इथं एकत्र येतील आणि त्याला बेदम चोप देऊन हाकलून लावतील!" आपला शेजारी लग्न झालेला आहे व त्याची बायको त्या ढोलीत गेले पाच दिवस घरटें बांधीत आहे ही गोष्ट चिक साफ विसरला होता.



त्या ढोलीत चिकने आपले डोके खुपसताच तात्काळ त्याच्या नाकावर कुणीतरी जोरदार प्रहार केला. चिकने एक किंकाळी फोडली व चटकन ढोलीबाहेर आला. नेमक्या त्याचवेळी त्याचा शेजारी, त्या घरट्याचा मालक परत आला होता. त्याने चिकवर पाठीमागच्या बाजूने हल्ला चढवला. दोन चिमणे हवेत एकमेकांशी भिडले आणि जमिनीवर कोसळून एका खड्डयात गडगडत गेले.

चिक चांगला पट्टीचा लढणारा होता. त्याचा शेजारी मारामारी हरत चालला होता.

पण त्यांच्या या मारामारीची चाहूल लागताच मोठे चिमणे तिथे उडत उडत आले. खरा दोषी कोण आहे याची त्यांना ताबडतोब कल्पना आली आणि त्यांनी चिकला असा बेदम चोप दिला की, आपण तिथून कसे निसटून पळालो याचीही चिकला आठवण राहिली नाही.

जेव्हा चिक शुद्धीवर आला तेव्हा त्याला असे आढळून आले की, पूर्वी ठाऊक नसलेल्या प्रदेशातल्या एका झुडुपात आपण पडलो आहोत. त्याची सारे हाडे जाम ठणकत होती.



घाबरलेली चिरिका त्याच्या शेजारी बसून होती.

"चिक, आपण आपल्या बागेत पुन्हा कधीही जायचं नाही! आपली पिल्लं आपण कुठं उबवायची?" चिरिकाने असा काही दुःखी आवाजात चिकला विचारले की, जर चिमण्यांना रडता येत असते तर चिकला नक्कीच जोरात रडू कोसळले असते.

जुन्या बागेतल्या मोठ्या चिमण्यांना आपण भेटलो तर आपल्याला ते मरेपर्यंत बदडून काढतील याची चिकला एव्हाना कल्पना आली होती. पण आपण घाबरलो आहोत हे त्याला चिरिकाला दाखवायचे नव्हते. आपली



विस्कटलेली पिसे त्याने सारखी केली, व्यवस्थित श्वास घेतला व तो म्हणाला: "काही अवघड नाही! आपण त्यापेक्षा चांगली जागा शोधून काढू!"

आणि नव्या घराच्या शोधासाठी ती दोघे उडत निघाली.

झुडुपांच्या प्रदेशातून बाहेर पडल्यावर त्यांना एक सुंदर निळी नदी दिसली. त्या नदीपलिकडे एक तांबड्या मातीची आणि वाळूची प्रचंड टेकडी उभी होती. त्या टेकडीच्या माथ्याजवळ एक तुटलेला कडा होता व तेथे अनेक बिळे होती. मोठ्या बिळांजवळ डोमकावळ्यांची आणि लहान जातीच्या बहिरीससाण्यांची जोडपी बसली होती आणि



छोटया बिळांमधून चपळ पाकोळ्या सारख्या आतबाहेर करीत होत्या. एखाद्या छोटया ढगाच्या आकारात पांढऱ्या पाकोळ्यांचा कळप कड्याभोवती घिरटया घालीत फिरत होता.

"किती आनंदी आहेत बघ ते," चिरिका चिकला म्हणाली, "आपणसुद्धा आपलं घरटं लाल टेकडीवर बांधू या."

चिकने डोमकावळ्यांकडे आणि लहान जातीच्या बहिरीससाण्यांकडे एकदा भीतीच्या नजरेने पाहिले. "पाकोळ्यांचं एकवेळ ठीक आहे", त्याने मनाशी विचार केला, "त्या आपली बिळे स्वतःच खोदतात. पण मला



कुणाचं तरी घरटं बळकावण्यासाठी लढाई करावी लागेल!" आणि मारामारीच्या विचारासरशी त्याची हाडे पुन्हा ठणकू लागली.

"छे:, मला नाही आवडलं इथं! या ठिकाणी एवढा कलकलाट आहे की बहिरं व्हायला होईल!" तो म्हणाला.



ते पुढे उडत निघाले.

पुढे त्यांना एक राई दिसली. त्या राईत एक छोटे घर होते व लाकडी फळ्यांचे एक छोटेसे खोपट होते.

चिक आणि चिरिका त्या खोपटाच्या छपरावर बसली तेव्हा तिथे चिमण्या किंवा पाकोळ्या रहात नाहीत हे त्यांच्या ताबडतोब लक्षात आले.

"इथं आपण मस्त राहू" चिक आनंदाने म्हणाला, "अंगणात धान्याचे दाणे व भाकरीचे तुकडे किती पडलेत बघ! आपण इथं एकटे राहू आणि आपल्या जवळ कुणाला फिरकू द्यायचं नाही."

"चिक," चिरिका घाबरल्या आवाजात म्हणाली, "त्या व्हरांड्यात तो बघ कसला भयंकर प्राणी बसलाय!"

तिचे बरोबर होते. व्हरांड्यात एक भला लठ्ठ तांबडा बोका झोपला होता.

"काही अडचण नाही!" शूरपणाने चिक म्हणाला, "तो आपल्याला काय करतोय? बघ मी त्याची कशी भंबेरी उडवतो ते!"

आणि त्याने एवढ्या जोराने बोक्यावर झेप घेतली की चिरिकासुद्धा घाबरून ओरडली.

पण बोक्याच्या अगदी पुढ्यातला पावाचा तुकडा चिकने सफाईन उचलला आणि ताबडतोब तो छपरावर परत आला.

बोक्याने जराही हालचाल केली नाही. त्याने हळूच एक डोळा उघडला आणि कुणी खोडी काढली ते नीट पाहून घेतले.

"पाहिलंस?" चिकने बढाई मारली, "आणि तू अजून त्याला घाबरतेस?"

चिरिकाने त्याच्याशी वाद घातला नाही. घरट्यासाठी सोयीस्कर जागा पहायला त्यांनी सुरुवात केली.

त्या लाकडी खोपटाच्या छताखालची एक पोकळी त्यांनी निवडली आणि तिथे गवताच्या काड्या, घोड्याचे केस व मऊ मऊ पिसे आणायला सुरुवात केली.



सुमारे आठवडा लोटला असेल नसेल, तेवढचा दरम्यान चिरिकाने पहिले अंडे घातले. अंडे छोटे होते आणि त्याच्यावर गुलाबी व करडे ठिपके होते. या घटनेचा चिकला एवढा आनंद झाला होता की, त्याने स्वतःच्या व आपल्या बायकोच्या गौरवानिमित्त एक गाणेसुद्धा रचले:

चिरिक, चिक-चिक,
चिरिक, चिक-चिक,
चिकी-चिकी-चिकी-चिकी,
चिकी-चिक चिरिक!



या छोटचा गाण्याला काहीही अर्थ नव्हता पण कुंपणावरून उडचा मारताना म्हणायला ते अगदी सोपे होते.

घरटचात सहा अंडी जमली तेव्हा चिरिकाने त्यांना उबवायला सुरुवात केली.

चिरिकासाठी किडे व माशा गोळा करायला चिक धावपळ करू लागला, कारण अंडी उबवायच्या वेळेस चिरिकाला अशा नाजुक-साजुक खाण्याची आवश्यकता होती. चिकला यायला जरा उशीर झाला तेव्हा तो कुठे आहे म्हणून चिरिका किंचित बाहेर डोकावली.

ज्या क्षणी चिरिका फटीतून बाहेर डोकावली त्याच क्षणी वरच्या छपरावरून तीक्ष्ण नख्या असलेला एक भला मोठा पंजा झेपावला व त्याने भसकन तिची पिसे धरली. चिरिकाने एका झटक्यासरशी स्वतःला सोडवून घेतले. तिची पिसे मात्र बोक्याच्या पंजात राहिली. एक क्षणभर जरी तिला उशीर झाला असता तरी तिला बोकोबाने नक्की गिळले असते.

बोक्याने तिला उडताना पाहिले. मग फटीत पंजा खुपसून गवत, काड्या, मऊ पिसे यांचा झुपका असलेले अख्खे घरटे बाहेर ओढून काढले. चिरिका उगीचच ओरडत राहिली. चिकने बोक्यावर हल्ला चढवला, पण त्याचा काहीही परिणाम झाला नाही. कुणीही त्यांच्या मदतीला धावले नाही. ती सहा बहुमोल अंडी त्या लाल चोराने शांतपणे मटकावली. ते रिकामे घरटे वाऱ्याच्या झुळकीबरोबर छपरावरून उडून गेले.





त्याच दिवशी चिमण्यांनी ते लाकडी खोपट कायमचे सोडले व तांबडया बोक्यापासून जास्तीत जास्त दूर राहण्यासाठी त्या राईमध्ये रहायला गेल्या.

राईमध्ये त्या चिमण्या अधिक नशीबवान होत्या. एक मोकळी ढोली त्यांना ताबडतोब रहायला सापडली. पुन्हा त्यांनी गवत-काडया गोळा करून घरटे बांधायला सुरुवात केली. आठवडाभर त्यांचे काम चालले होते.

त्यांच्या शेजारी जाड चोचीचे फिंच पक्ष्यांचे एक जोडपे रहात होते; माशा पकडून खाणारे एक ठिपकेदार पक्ष्यांचे जोडपे व नखरेबाज पिवळया गाणाऱ्या पक्ष्यांचे जोडपे रहात होते. प्रत्येक जोडप्याचे आपले स्वतःचे घर होते, खायला भरपूर होते. पण केवळ आपली ताकद आणि शौर्य दाखविण्यासाठी चिक आपल्या शेजाऱ्यांशी भांडण उकरून काढीत होता.

पण फिंच चांगला मजबूत होता. त्याने चिकची चांगली कणीक तिंबली. मग मात्र चिक अधिक सावध बनला. तो आता मारामारीला सुरुवात करीत नसे. पण शेजाऱ्यांपैकी कुणी जवळून उडत जाऊ लागले की, पिसे फुलवीत असे व युद्धाच्या घोषणांप्रमाणे आवाज करू लागे. पण शेजारी त्याच्याकडे लक्ष देत नसत. आपल्या ताकदीची घमेंड मिरवायची त्यांनाही हौस होती.

त्या दिवशी फिंचने पहिला सावधगिरीचा इशारा दिला. चिमण्यांपासून तो तसा दूर रहात होता, पण चिकने तो इशारा ऐकला: "रूम् पिंक पिंक! रूम् पिंक पिंक!"

"लौकर!" चिक चिरिकाला उद्देशून ओरडून म्हणाला, "फिंच सावधगिरीचा इशारा देतोय तो ऐकलास की नाही? याचा अर्थ धोका जवळपास आहे!"

चिकचा अंदाज बरोबर होता. एक महाभयानक प्राणी त्यांच्या दिशेने येत होता. फिंचच्या पाठोपाठ पिवळ्या गाणाऱ्या पक्ष्याने धोक्याचा इशारा दिला व त्या मागोमाग ठिपकेदार पक्ष्यानेही आवाज दिला. ठिपकेदार पक्षी चिकपासून फक्त चार झाडांच्या अंतरावर रहात होता. त्याने शत्रूला पाहिले याचा अर्थ शत्रू अगदी जवळ येऊन ठेपला होता.





चिरिका घरट्यातून बाहेर उडाली व चिकशेजारी फांदीवर जाऊन बसली. शेजाऱ्यांनी त्यांना सावधानतेचा इषारा दिला व ते स्वतः संकटाला तोंड द्यायला सिद्ध झाले.

झुडपात त्यांना तांबड्या केसाळ शेपटीचा झुपका दिसला व लौकरच त्यांचा हाडवैरी – तो तांबडा बोका – मोकळ्या जागेत उतरला. शेजाऱ्यांनी त्याच्या अस्तित्वाची आधीच जाणीव दिली आहे व चिरिकाला घरट्यात पकडण्याची संधी आज हुकली आहे याची त्याला जाणीव होती. त्यामुळे तो भयंकर संतापला होता. एकाएकी त्याच्या शेपटीचे टोक वळवळू लागले व डोळे बारिक झाले. बोक्याला झाडातले बीळ दिसले. चिमणीच्या अर्ध्या डझन अंड्यांचा सकाळीच फराळ मस्त होईल असा विचार त्याच्या मनात डोकावला. बोक्याने जिभल्या चाटल्या. सरसर झाडावर चढून त्याने त्या बिळात पंजा खुपसला.

चिक आणि चिरिकाने प्रचंड चिवचिवाट केला, पण येथेही कुणीच त्यांच्या मदतीला धावून आले नाही. शेजारी आपापल्या झाडांवर बसून घाबरून ओरडत होते. प्रत्येक जोडप्याला आपल्या घरट्याची काळजी वाटत होती.

आपली धारदार नखे जोरात खुपसून बोक्याने बिळातून घरटे बाहेर उपसून काढले. पण यावेळी त्याने जरा घाई केली होती. घरटचात अंडी नव्हती. बोक्याने सारे घरटे उलथेपालथे केले, पण त्यात त्याला एकही अंडे सापडले नाही.

मग त्याने घरटे खाली फेकून दिले व तो स्वतः झाडावरून खाली उतरला. चिमण्यांचा चिवचिवाट चालूच होता.

बोका परत झुडपात चालत गेला व जाण्यापूर्वी त्याने एकदा मागे वळून पाहिले. जणू त्याला म्हणायचे होते: "ठीक आहे बेटचांनो, माझ्यापासून तुम्ही लपून राहणे शक्य नाही! तुम्ही खुशाल दुसरे घरटे बांधा, तुम्हाला हवी तेथे खुशाल तुमची पिल्ले घाला, तरी मी तुम्हाला शोधून काढीन आणि त्यांना मटकावीन. इतकेच नव्हे तर तुम्हालाही गट्टम् करीन!" आणि बोका एवढचा जोराने गुरगुरला की, चिरिका भीतीने थरथर कापू लागली.

बोका निघून गेला आणि चिक व चिरिका आपल्या उध्वस्त घरटचाजवळ शोक करीत बसली.



अखेरीस चिरिका म्हणाली : "चिक, आणखी थोडचा दिवसांनंतर मी नक्की पुन्हा नवी अंडी घालणार. आपण आता लौकर इथून दूर नदीच्या पलिकडे जाऊ या आणि घरटचाला नवी जागा शोधू या. नदीपलिकडे बोका येणार नाही!"

नदीवर पूल आहे हे चिरिकाला ठाऊक नव्हते आणि बोका अनेकवेळा पूल ओलांडून नदीपलिकडे जात असे. ही गोष्ट चिकलाही ठाऊक नव्हती. "चल जाऊ या," तो चिरिकाला म्हणाला.

आणि ते उडू लागले.

लौकरच ते पुन्हा त्या लाल टेकडीपाशी येऊन पोहोचले.

"आमच्याकडे या! आमच्याकडे या!" तेथील पाकोळ्या आपल्या पाकोळ्यांच्या भाषेत म्हणाल्या. "आमच्या लाल टेकडीवर आम्ही सारे एका कुटुंबातल्यासारखे आनंदाने राहतो!"

"तुम्ही आमच्याशी भांडण कराल अशी मला भीती वाटते," चिक ओरडून म्हणाला.





‘कशाला आम्ही भांडू ?” पाकोळयांनी उलट ओरडून विचारले. “नदीवर भरपूर पतंग उडतात. ते प्रत्येकाला खायला पुरेसे आहेत. शिवाय इथे खूप मोकळी बिळे आहेत. तुम्हाला आवडेल ते रहायला निवडा.”

“आणि त्या लहान बहिरीससाण्यांचं नि डोमकावळयांचं काय ?” चिकने विचारले.

“बहिरीससाणे शेतात टोळ आणि उंदीर पकडतात. ते कधीही आमचा अपमान करीत नाहीत. आम्ही सारे मित्र आहोत.”

चिरिका म्हणाली : "चिक, माझं जरा ऐक. आपण खूप प्रवास केला, पण एवढी सुंदर जागा आपण दुसरीकडं कुठं पाहिली नाही. आपण इथंच राहू या."

"ठीक आहे," चिक म्हणाला, "इथं बरीच मोकळी बिळं आहेत आणि कुणी आपल्याशी भांडण करणार नाही. तेव्हा इथं राहून बघायला हरकत नाही."

ते आणखी जवळ उडत आले, पण बहिरीससाण्यांनी किंवा डोमकावळ्यांनी त्यांच्याकडे ढुंकूनसुद्धा पाहिले नाही.

मोठ्या तोंडाचे व अधिक खोल नसलेले बीळ ती दोघे शोधू लागली. अशी एकाशेजारी एक असलेली दोन बिळे त्यांना सापडली.

एका बिळात त्यांनी घरटे बांधले व तेथे चिरिका अंडी उबवू लागली.
दुसऱ्या बिळात चिक रात्रीचा झोपू लागला.



पाकोळ्या, बहिरीससाणे व डोमकावळे यांनी आपली पिले पूर्वीच जन्माला घातली होती. एकटी चिरिका त्या अंधाऱ्या बिळात धीर धरून अंडी उबवीत बसली होती. सूर्योदयापासून ते सूर्यास्तापर्यंत चिक तिला खायला आणून देत होता.

दोन आठवडे उलटले. तांबडा बोका काही आला नाही. चिमण्या एव्हाना त्याला पार विसरून गेल्या होत्या.

आपली पिले केव्हा जन्मतात हे पहायला चिक अगदी अधीर झाला होता. दरवेळी तो चिरिकाला एखादी अळी किंवा माशी आणून द्यायचा तेव्हा विचारायचा :



"कवच ठोकायला लागली का ती?"

"अजून नाही."

"लौकरच ती ठोकायला सुरुवात करतील का?"

"होय लौकरच," चिरिका त्याला धीर देत म्हणायची.

एके दिवशी सकाळी चिरिकाने चिकला बिळातून हाक मारली: "लौकर ये! एकाने कवच फोडायला सुरुवात केलीय!"

चिक घाईघाईने घरटयात आला. आपल्या नाजुक बारीक चोचीने पिल्लू हळूच कवचाला धक्के देत असलेले त्याने ऐकले.

चिरिकाने काळजी घेऊन त्याला मदत केली. कवचाला तिने अनेक ठिकाणी चोची मारून भेगा पाडल्या.

काही मिनिटांनंतर पिल्लू अंडयातून डोकावले. ते छोटुकंले होते, त्याच्या अंगावर पिसे नव्हती आणि त्याचे डोळे मिटलेले होते. त्याचे भलेमोठे डोके बारिकशा मानेवर लटलटत होते.

"किती गंमतीदार प्राणी आहे हा!" चिक आश्चर्य व्यक्त करीत म्हणाला.

"तो मुळीच गंमतीदार नाही," चिरिका रागावून म्हणाली, "माझा बाळ मोठा सुंदर आहे. आणि तुझं इथं काही एक काम नाही. मुकाट ते रिकामं कवच उचल आणि घरटयापासून कुठं तरी लांब टाकून ये."

अंडयांची रिकामी टरफले चिक नेऊन टाकीत होता तेव्हा दुसरे पिल्लू अंडयाबाहेर आले आणि तिसरे कवच ठोठावू लागले होते.

आणि एवढयात लाल टेकडीवर सावध राहण्याचा इषारा आला.

पाकोळ्यांचा कर्कश्य कलकलाट चिमण्यांना आपल्या बिळात ऐकू आला. चिक चटकन बाहेर आला व त्याने ताबडतोब बातमी आणली की, तांबडा बोका टेकडी चढून कडयाकडे येतोय.

"त्यानं मला पाहिलंय," चिक ओरडून म्हणाला, "आता लौकरच तो इथं येऊन थडकेल आणि आपल्या मुंडीसकट आपल्याला खेचून बाहेर काढील! आपण इथून ताबडतोब उडून दूर जाऊ या!"

"नाही," चिरिका दु:खी आवाजात उत्तरली. "मी माझ्या पिल्लांना सोडून जाणार नाही! काय व्हायचं असेल ते होऊन जाऊ दे!"

चिकने तिची खूप मनधरणी केली, पण ती आपल्या जागेवरून तसूभरही हलली नाही.

तेव्हा चिक घरट्यातून बाहेर पडला व एखाद्या वेड्यासारखे त्याने बोक्यावर हल्ले चढवायला सुरुवात केली तरीही बोका टेकडी चढतच राहिला. पाकोळ्या एखाद्या ढगासारख्या त्याच्यावर घोंघावू लागल्या. बहिरीससाणं व डोमकावळेही अधिक मोठा आवाज करीत त्यांच्या मदतीला धावले.

बोका चपळाईने वर चढला आणि त्याने बिळाचे तोंड पंजाने पकडले.



आता आपला पंजा आत खुपसायचा आणि चिरिका, पिल्ले व अंडी यांच्यासकट घरटे बाहेर खेचायचे एवढेच त्याचे काम राहिले होते.

पण नेमक्या त्या क्षणाला एका बहिरीससाण्याने बोक्याच्या शेपटीवर जोरात चोच मारली, दुसऱ्याने बोक्याच्या डोक्यावर प्रहार केला आणि दोन डोमकावळे बोक्याच्या पाठीवर तुटून पडले.



बोका वेदनेने कळवळून फिस्कारला आणि मागे वळून आपल्या पंजाने त्याने या पक्ष्यांना पकडायचा प्रयत्न केला. पण त्यांनी त्याच्या नख्यांना हुकवले आणि बोक्याचा तोल जाऊन तो खाली गडगडू लागला. वाटेत आधार धरायला त्याला काहीच मिळेना. त्याच्या बरोबर वाळूही खाली घसरत होती व बोका अधिक जोराने खाली गडगडत चालला होता.

कड्यावरून पक्ष्यांना तो दिसेनासा झाला. त्यांना फक्त लाल धुळीचा लोट दिसला. धुडुम! – आणि नदीच्या पाण्यावर धुळीचा ढग तरंगत राहिला. धूळ विरली तेव्हा पक्ष्यांना नदीच्या मध्यभागी पाण्यात बोक्याचे भिजलेले डोके दिसले. चिकने त्याच्यावर घिरट्या घातल्या व जोरजोराने बोक्याच्या डोक्याला चोची मारल्या.

बोका नदी पोहत पलिकडच्या तीरावर गेला तरी चिकने त्याचा पिच्छा सोडला नाही. बोका एवढा घाबरला होता की त्याला चिकला पकडायचा धीर झाला नाही. त्याने आपली भिजलेली शेपूट उचलली आणि घराकडे धूम ठोकली.

तेव्हापासून लाल बोका लाल टेकडीच्या जवळ कधीही फिरकला नाही.



